क्रमांक: संकिर्ण-२०११/प्र.क्र.११६/योजना-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक २७ एप्रिल, २०११.

प्रति,

उप आयुक्त (विकास),
विभागीय आयुक्त यांचे कार्यालय,
कोकण, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/
अमरावती/नागपूर.

विषय :- दि.११ एप्रिल, २०११ रोजी उप आयुक्त (विकास) यांचेशी झालेल्या स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या अंमलबजावणी आढावा बैठकीचे कार्यवृत्त.

महोदय,

दि.११ एप्रिल, २०११ रोजी उप आयुक्त (विकास) यांचेशी झालेल्या सन २०१०-११ (मार्च,२०११ अखेर) या कालावधीतील स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या अंमलबजावणी आढावा बैठकीच्या कार्यवृत्ताची प्रत सोबत जोडली आहे.

२. या कार्यवृत्तातील निर्णयानुसार विहीत मुदतीत कार्यवाही करुन शासनास जिल्हानिहाय एकत्रित अहवाल पाठविण्यात यावा.

३. सदर कार्यवृत्त शासनाच्या www.maharashtra.gov.in वर संगणक सांकेतांक २०११०५०२१४५३७००१ वर उपलब्ध आहे.

आपला विश्वासू,

सोबत: वरीलप्रमाणे

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत सहपत्रासह आवश्यक त्या कार्यवाहीसाठी रवाना:-
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)

D:\data\c diskAdhava Baithak 12-8-2010.lwp-32

# दिनांक ११ एप्रिल, २०११ रोजी उप आयुक्त (विकास) यांच्या स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा बैठकीचे कार्यवृत्त .

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>विषय</th><th>बैठकीतील निर्णय</th><th>अंमलबजावणी करणारे अधिकारी व अंमलबजावणीचा कालावधी</th></tr>
<tr><td>१</td><td>आर्थिक प्रगती</td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td>अ) जिल्ह्यांना लागलेली कपात</td><td>सन २०१०-११ मध्ये केंद्र शासनाने दुसऱ्या हप्त्याचा निधी देतांना मोठ्या प्रमाणावर कपात केली आहे. नागपूर व धुळे वगळता अन्य विभागांना कपात मुक्त झालेली नाही. ही खेदाची बाब आहे. नंदुरबार, जळगाव, अहमदनगर, सातारा, सोलापूर, जालना, हिंगोली, नांदेड, लातूर, वाशीम, अमरावती, वर्धा, नागपूर, भंडारा, गोंदिया व गडचिरोली या जिल्ह्यांना मिळणाऱ्या निधीमध्ये कपात लागल्यामुळे राज्याला कमी प्रमाणात निधी प्राप्त झाला, पर्यायाने दारिद्रय रेषेखालील स्वरोजगारींना लाभ देता आला नाही. जिल्ह्याचे व राज्याचे नुकसान झाले.<br>या जिल्ह्यांनी आता सदर कपातीचा निधी प्राप्त करुन घेण्यासाठी केंद्र शासनाकडे प्रस्ताव पाठवावा व निधी प्राप्त करुन घ्यावा.</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,<br>प्रकल्प संचालक, जिल्हा ग्राम विकास यंत्रणा,<br>१ महिना</td></tr>
<tr><td></td><td>•</td><td>ज्या जिल्ह्यांना सन २०१०-११ मध्ये राज्य समरुप हिस्सा कमी मिळालेला आहे. अशा जिल्ह्यांकडून खालील नमुन्यातील माहिती घेऊन जिल्हानिहाय एकत्रित माहिती शासनास पाठवावी, जेणेकरुन सन २०११-१२ मध्ये उपलब्ध निधीच्या अधीन राहून SCP क्षेत्रातून निधी वितरण करता येईल :-<br><table><tr><th>एकूण प्राप्त केंद्र हिस्सा</th><th>अनुज्ञेय राज्य समरुप हिस्सा</th><th>प्रत्यक्ष प्राप्त राज्य समरुप हिस्सा</th><th>कमी असलेल्या राज्य समरुप हिस्सा</th><th>SCP मधून आवश्यक अवितरित निधी</th></tr><tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr></table></td><td>उप आयुक्त (विकास)<br>१५ दिवस</td></tr>
<tr><td></td><td>ब) खर्च</td><td>या बैठकीत प्राप्त झालेल्या माहितीच्या अनुषंगाने योजनेवर झालेला एकूण खर्चाची टक्केवारी ९८% आहे. एकूण टक्केवारीपेक्षा कमी टक्केवारी असलेले जिल्हे ठाणे (९७ %), रत्नागिरी (९६ %), नाशिक (९५ %), धुळे (८५ %), नंदूरबार (९६ %), सोलापूर (९५ %), लातूर (९३ %), बुलढाणा (९४ %), अकोला (९३ %), वाशिम (९४ %) व गडचिरोली (९४ %) आहेत. सदर आकडेवारी तात्पुरत्या स्वरुपात दिलेली असून अंतिम करण्यापूर्वी संबंधित प्रकल्प संचालक यांनी खर्चाची टक्केवारी किमान राज्या सरासरी इतकी असेल याची दक्षता घ्यावी.<br>रायगड व नांदेड जिल्ह्यांनी उपलब्ध निधीच्या १०४ % खर्च केला आहे. त्याबाबत उप आयुक्त (विकास) यांच्यामार्फत खुलासा सादर करावा.</td><td>संबंधित प्रकल्प संचालक, जिल्हा ग्राम विकास यंत्रणा,<br>उप आयुक्त (विकास)<br>१ महिना</td></tr>
</table>

| | | | |
|---|---|---|---|
| २ | **भौतिक प्रगती** | | |
| | अ) वैयक्तीक स्वरोजगारींना सहाय्य | केंद्र शासनाने सन २०१०-११ या वर्षात वैयक्तिक स्वरोजगारींना सहाय्य करण्याचे एकूण उद्दीष्ट २५८२९ लाभार्थी इतके विहीत केलेले होते. त्यानुसार राज्याचे एकूण साध्य ८७% इतके झाले आहे. मात्र रत्नागिरी(७१%), नाशिक (६२%), धुळे (६३%), नंदूरबार (६०%), अहमदनगर (५८%), पुणे (७९%), सातारा (४८%), जालना (५४%), लातूर (४५%),अकोला (७०%), वाशिम (७३%), यवतमाळ (८२%), इतके साध्य आहे. या जिल्ह्यामुळे अन्य जिल्ह्यांनी उत्तम साध्य करुनही राज्याची सरासरी खाली जात आहे. सदर आकडेवारी तात्पुरत्या स्वरुपाची असून ती अंतिम करण्यात यावी व ९०% पेक्षा कमी साध्य असलेल्या जिल्ह्यांनी संबंधित उप आयुक्त (विकास) यांच्या मार्फत खुलासा सादर करावा.<br>कोल्हापूर जिल्ह्याने साध्य १७१% दर्शविले आहे. त्याबाबत आकडेवारी तपासून उप आयुक्त (विकास) यांच्या मार्फत शासनास कळवावी. | संबंधित प्रकल्प संचालक, जिल्हा ग्राम विकास यंत्रणा, उप आयुक्त (विकास)<br>१५ दिवस |
| | ब) अल्प संख्यांक स्वरोजगारींना सहाय्य | केंद्र शासनाने सन २०१०-११ या वर्षात अल्प संख्यांक स्वरोजगारींना सहाय्य करण्यासाठी २६१९१ स्वरोजगारींचे उद्दीष्ट्य दिले होते. त्यानुसार एकूण साध्य ६४% इतके झाले आहे. यामध्ये अहमदनगर (९८%), पुणे (१०१%), सोलापूर (९०%), कोल्हापूर (११९%), औरंगाबाद (९०%), जालना (१०२%), परभणी (१०४%), हिंगोली (१०२%), बीड (९०%), नांदेड (१००%), उस्मानाबाद (९४%), लातूर (९७%), बुलढाणा (१७७%), अमरावती (१००%), यवतमाळ (९९%) हे जिल्हे वगळता अन्य जिल्ह्यांचे साध्य अत्यंत नगण्य आहे. उद. गडचिरोली (६%), गोंदिया (८%), चंद्रपूर (९%), भंडारा (१०%).<br>राज्यातील जिल्हयांमध्ये दारिद्रय रेषेखालील अल्पसंख्यांक कुटुंबांचे सर्वेक्षण करुन निश्चित आकडा निर्धारित करण्याबाबत वारंवार बैठकांमध्ये सांगण्यात आले होते. दिनांक १२ ऑगस्ट, २०१० रोजी बैठकीच्या कार्यवृत्तामध्ये त्याप्रमाणे नमूद करुन जिल्हानिहाय सर्वेक्षण करुन अ) जिल्ह्यातील दारिद्रय रेषेखालील एकूण अल्पसंख्यांक स्वरोजगारी संख्या, ब) सहाय्य केलेले अल्पसंख्याक स्वरोजगारी संख्या व क) सहाय्य करावयाचे शिल्लक अल्प संख्यांक स्वरोजगारी संख्या या नमुन्यात जिल्हानिहाय एकत्रित माहिती सर्व उप आयुक्त (विकास) यांनी शासनास १५ दिवसात सादर करावी, अशा सुचना देण्यात आल्या होत्या. मात्र त्याप्रमाणे कार्यवाही झाली नाही.<br>वास्तविक वरीलप्रमाणे कार्यवाही झाली असती तर उपलब्ध अल्पसंख्याकांच्या प्रमाणात सुधारित उद्दीष्ट वेळेत देता आले असते. परिणामी राज्याच्या एकूण प्रगतीवर त्याचा प्रतिकूल परिणाम झाला नसता.<br>आता सन २०११-१२ या वर्षासाठी वरीलप्रमाणे सर्वेक्षण करुन विहित नमून्यातील जिल्हानिहाय माहिती संबंधित उप आयुक्त (विकास) यांनी शासनास सादर करावी, जेणेकरुन उपलब्ध अल्पसंख्यांक लाभार्थ्यांच्या मर्यादेत उद्दीष्ट वाटप करता येईल.<br>याबाबत जिल्ह्याकडून स्वतंत्र पत्रव्यवहार शासनाकडे होणार नाही याची दक्षता घ्यावी. | संबंधित प्रकल्प संचालक, जिल्हा ग्राम विकास यंत्रणा, उप आयुक्त (विकास)<br>१५ दिवस |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | **R-SETI** | अ) राज्यामध्ये ठाणे, रत्नागिरी, नाशिक, जळगांव, अहमदनगर, पुणे, सोलापूर, औरंगाबाद, लातूर, अमरावती व नागपूर या एकूण ११ जिल्ह्यात R-SETI मंजूर झालेल्या असून ठाणे, अहमदनगर व अकोला हे ३ जिल्हे वगळता उर्वरित जिल्ह्यांना रु. ५० लाख इतका निधी प्राप्त झालेला आहे. मात्र नाशिक, सोलापूर, जळगाव व औरंगाबाद हे जिल्हे वगळता अन्य जिल्ह्यामध्ये जमीन मंजूरीची प्रक्रिया अत्यंत संथ गतीने चालू आहे. एकूणच या योजनेबाबत राज्यात अनास्था दिसून आल्याने शासन स्तरावरुन वारंवार पाठपुरावा करण्यात येत आहे. तथापि, R-SETI मंजूर झालेल्या जिल्हयातही समाधानकारक प्रगती नसल्याने उप आयुक्त (विकास) यांनी या प्रकरणात लक्ष घालून, आवश्यकता वाटल्यास, उप आयुक्त (महसूल) यांचेशी संपर्क साधून विभागीय आयुक्त यांचे स्तरावरुन जमिनीचा ताबा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस मिळेल अशी कार्यवाही करावी.<br>या प्रकरणी योग्य पाठपुरावा न करणाऱ्या जिल्ह्यांचा खुलासा उप आयुक्त (विकास) यांनी प्राप्त करुन घेऊन एकत्रित शासनास सादर करावा.<br><br>ब) R-SETI मंजूर झालेल्या जिल्ह्यांव्यतिरिक्त अन्य जिल्ह्यांनी जमीन मंजूर करुन घेऊन केंद्र शासनाकडे प्रस्ताव पाठविणे आवश्यक आहे. मात्र रायगड, सिंधुदूर्ग, हिंगोली, बीड, वाशिम, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्ह्यांनी R-SETI मंजुरी बाबतचा प्रस्ताव अद्यापि NIRD कडे पाठविलेला नाही. किमान अर्धा एकर पर्यंत जागा निश्चित करुन जागेच्या वर्णनासह प्रस्ताव NIRD कडे पाठविण्यात याव्यात, अशा सुचना वारंवार देण्यात आल्या आहेत. तथापि, अद्यापि कार्यवाही झालेली नाही.<br>विदर्भ विकास कार्यक्रमामध्ये गडचिरोली जिल्ह्यातील प्रशिक्षण कार्यक्रमांचा अंतर्भाव असून तेथे R-SETI प्राधान्याने सुरु होणे आवश्यक आहे.<br>वरील कार्यक्रमात प्रगती न झाल्याबाबत खुलासा संबंधित जिल्ह्यांकडून प्राप्त करुन घेऊन एकत्रितरित्या संबंधित उप आयुक्त (विकास) यांनी शासनास सादर करावा. | प्रकल्प संचालक, जिल्हा <u>ग्रामीण विकास यंत्रणा, उप आयुक्त (विकास)</u><br>१ महिना |
| ४ | **व्याजदरावर अनुदान वितरण करण्याबाबत** | अ) सन २००८-०९ मध्ये शासनाने एकूण रु.१०.०० कोटी वितरीत केले आहेत. तथापि, २ वर्षाचा कालावधी होऊनही अद्यापि स्वयंसहायता गटांना पूर्णपणे अनुदान वितरण झाले नाही. तसेच पात्र गटही अद्यापि निश्चित करण्यात आलेले नाहीत, असे दिसते. वास्तव दिनांक १२ ऑगस्ट, २०१० रोजी बैठकीच्या कार्यवृत्तामध्ये त्याप्रमाणे नमूद करुन ऑगस्ट-सप्टेंबर पर्यंत मोहिम आखून पात्र गटांची संख्या निश्चित करण्यात यावी व अनुदान वितरीत करावे, अशा सुचना देण्यात आल्या होत्या. मात्र त्याप्रमाणे कार्यवाही झालेली दिसत नाही. ज्या जिल्ह्यांकडे अनुदान मोठ्या प्रमाणात शिल्लक आहे. त्या जिल्ह्यांनी कार्यवाही न केल्याबाबतचा खुलासा संबंधित उप आयुक्त (विकास) यांच्या मार्फत शासनास सादर करावा.<br>संबंधित उपआयुक्त (विकास) यांनी जिल्ह्यांचा खुलासा प्राप्त करुन घेऊन एकत्रितरित्या त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा. | प्रकल्प संचालक, जिल्हा <u>ग्रामीण विकास यंत्रणा, उप आयुक्त (विकास)</u><br>१५ दिवस |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ब) सन २०१०-११ मध्ये शासन स्तरावरुन जिल्ह्याच्या मागणीप्रमाणे निधी वितरीत करण्यात आला. तथापि, अमरावती जिल्ह्यांने त्यांनी दिलेल्या माहितीमध्ये "१२३ गट अनुदानासाठी पात्र आहेत. पण शासनाकडून निधी पुरेसा नाही" असे नमूद केले आहे. वास्तविक जिल्ह्याच्या मागणीनुसार उप आयुक्त (विकास) यांनी कळविल्याप्रमाणे अमरावती जिल्ह्यास रु. २५ लाख वितरित करण्यात आले. असे असतांना अ) वरीलप्रमाणे अभिप्राय देण्याचे व ब) पुरेसा निधीची मागणी न करण्याचे व परिणामी गटांना लाभापासून वंचित ठेवण्याचे तसेच अर्थसंकल्पातील निधी पुरेसा खर्च झाला नाही याबाबतचा खुलासा संबंधित उप आयुक्त (विकास) यांच्या मार्फत करावा.<br>अहमदनगर जिल्ह्याने यासाठीचा निधी DPDC कडूनही प्राप्त केल्याचे दिसून येते. वास्तविक सदर योजना राज्यस्तरावरील असून DPDC मध्ये त्याची तरतूद करण्याचे कारण दिसून येत नाही. याची नोंद घेऊन आता झालेल्या चुकीच्या कार्यवाहीबद्दल काय उपाययोजना करण्यात येत आहे. याबाबतचा खुलासा अहमदनगर जिल्ह्याने संबंधित उप आयुक्त (विकास) यांच्यामार्फत करावा. | |
| ५ | मागील बैठकीच्या कार्यवृत्तावरील कार्यवाहीची माहिती | योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे व्हावी, यासाठी शासन स्तरावरुन वेळोवेळी बैठका घेतल्या जातात, त्याबाबतचे कार्यवृत्तही निर्गमित करण्यात येते. मात्र या कार्यवृत्ताची दखल घेऊन कार्यवाही केल्याचे दिसत नाही. कार्यपूर्ती अहवालही शासनास सादर करण्यात येत नाही. ही बाब अत्यंत असमाधानकारक असून शासनाने बैठकांमध्ये दिलेल्या सुचनांविषयी अनास्था दर्शविणारी आहे. यापुढे प्रत्येक बैठकीतील सुचनाबाबतचा एकत्रित कार्यपूर्ती अहवाल शासनास सादर केला जाईल, याची उप आयुक्त (विकास) यांनी दक्षता घ्यावी. तसेच प्रत्येक बैठकीत मागील बैठकीतील कार्यवृत्तावरील झालेल्या कार्यवाहीची माहिती द्यावी. | उप आयुक्त (विकास)<br>१ महिना |
| ६ | बैठकीसाठीची माहिती विहीत नमुन्यात, विहीत प्रतीत व विहीत मुदतीत पाठविण्याबाबत. | शासन स्तरावर उप आयुक्त (विकास) यांचे बैठकीत योजनांचा आढावा घेतला जातो. या बैठकीमध्ये आढावा घ्यावयाच्या माहितीचे विहीत नमुने सर्व उप आयुक्त (विकास) यांना पुरविण्यात आले आहेत. मात्र, शासन स्तरावर मागील ३ वर्षापासून वारंवार बैठेका घेऊनही खालील त्रुटी आढळून आल्याः-<br>अ) माहिती विहीत नमुन्यात नसते. ब) माहितीची पडताळणी उप आयुक्त (विकास) यांचे स्तरावर केली जात नाही. बैठकीमध्ये माहितीतील विसंगती लक्षात येते. क) माहिती ३ प्रतीत मागविली असूनही १ किंवा २ प्रतीत दिली जाते. ड) शासन स्तरावर माहितीचे संकलन करण्यासाठी दिलेल्या मुदतीत शासनास प्रती पाठविल्या जात नाहीत.<br>सदर त्रुटींची पुनरावृत्ती होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची सुचना दिनांक १२ ऑगस्ट, २०१० रोजी बैठकीच्या कार्यवृत्तामध्ये नमूद केली होती. मात्र दि.११ एप्रिल, २०११ च्या बैठकीत या त्रुटींची पुनरावृत्ती झाल्याचे आढळून आले, ही बाब असमाधानकारक असून वरील सुचनेचा पुनर्उच्चार करण्यात येत आहे. | उप आयुक्त (विकास) |